महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,
गट-अ मधील विशेषज्ञ संवर्गातील
बदल्या / पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२०/प्र.क्र.१५५/सेवा-२**
गो.ते.रुग्णालय इमारत,१० मजला, ए विंग,
मंत्रालय,मुंबई -४०० ००१
दिनांक : ०१ ऑक्टोबर, २०२०

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सद्यस्थितीमध्ये राज्यात कोरोना साथरोग संसर्गाचा प्रादुर्भाव वेगाने वाढत असल्याने त्यासंबंधी योग्य त्या उपाययोजना करण्याकरीता महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (वेतन स्तर एस-२३: ६७७००-२०८७००) मधील विशेषज्ञ संवर्गातील अधिकाऱ्यांची खालीलप्रमाणे विनंती / प्रशासकीय बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १. | डॉ. (श्रीमती) संगिता व्ही. पाटील (भिसे), वैद्यकीय अधिकारी (कान, नाक, घसा तज्ञ), सामान्य रूग्णालय, गोंदिया. | वैद्यकीय अधिकारी (रूग्णालयीन प्रशिक्षण केंद्र), वर्धा. (रिक्त पदी) (विनंतीनुसार तात्पुरता संवर्ग बदलून) |
| २. | डॉ. अजय रामचंद्र कांबळे, वैद्यकीय अधिकारी (कान नाक, घसा तज्ञ), सामान्य रूग्णालय, हिंगोली. | वैद्यकीय अधिकारी (कान, नाक, घसा तज्ञ), सामान्य रूग्णालय, गडचिरोली. (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |
| ३. | डॉ. सुनिल गंगाराम पल्लेवाड, बधिरीकरण तज्ञ, सामान्य रूग्णालय, बुलढाणा. | बधिरीकरण तज्ञ, स्त्री रूग्णालय, नांदेड. (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |
| ४. | डॉ. मंगेश रंगनाथराव थेटे, क्ष-किरण तज्ञ, सामान्य रूग्णालय, अहमदनगर. | क्ष-किरण तज्ञ, विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय, नाशिक. (रिक्त पदी) (विनंतीनुसार) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांचेविरुध्द संचालनालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१००११६३०१३५४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe518955 6b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, serialNumber=9ab69d6945f8950a9525831f8ae9 726be295d17576e78d19fa8f6cb952bb04a0, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2020.10.01 18:39:33 +05'30'

**(वि. पुं. घोडके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
४) सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), मुंबई
५) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
६) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
७) अधीक्षक, स्त्री रूग्णालय, नांदेड.
८) अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रूग्णालय, नाशिक.
९) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर
११) जिल्हा कोषागार अधिकारी ( सर्व )
१२) मा.मंत्री (आरोग्य) / मा.राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
१३) मा.प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१४) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)
१५) निवड नस्ती (सेवा - २ )